**उप सचिव हे पद सह सचिव या पदात**
**<u>श्रेणीवाढ व रुपांतरीत करण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-ओएफएम-२०१७/ प्र.क्र.४१४/ई**
मंत्रालय (मुख्य इमारत), पहिला मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०९ ऑगस्ट, २०१७.

**वाचा:-** १) सामान्य प्रशासन विभाग, अ.शा.प.क्र.एईओ-१११७/५/२०१७/दहा, दि.११.५.२०१७.
२) महसूल व वन विभाग, आदेश क्र.ओएफएम-२०१७/प्र.क्र.४१४/ई, दि.१४.६.२०१७.

**शासन निर्णय:-**

सामान्य प्रशासन विभागाचे अ.शा.पत्र क्र. एईओ-१११७/५/२०१७/दहा, दि.११.५.२०१७ अन्वये श्री.अरुण उन्हाळे (भाप्रसे) यांची सह सचिव (मदत व पुनर्वसन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई या रिक्त पदावर पदस्थापना करण्यात आली असून त्याप्रमाणे श्री.अरुण उन्हाळे यांची दि.१२.६.२०१७ (म.पू.) पासून महसूल व वन विभागात सह सचिव पदावर पदस्थापना करण्यात आली आहे. तथापि या विभागात सह सचिव पद उपलब्ध नसल्याने, सध्या रिक्त असलेले मंजूर उप सचिवाचे (वेतनसंरचना पीबी-३, रुपये १५६००-३९१०० व ग्रेड वेतन रु.७६००/-) एक पद सह सचिव या पदात (वेतनसंरचना वेतन बँड पीबी-४, रुपये ३७४००-६७००० व ग्रेड वेतन रु.८७००/-) दि.१२.६.२०१७ (म.पू.) पासून तात्पुरत्या श्रेणीवाढीने रुपांतरीत करण्यात येत आहे.

२. उपरोक्त रुपांतरीत केलेले सह सचिव हे पद श्री.अरुण उन्हाळे (भाप्रसे), सह सचिव हे त्या पदावर असेपर्यंत अस्तित्वात राहील. त्यानंतर सदर पद आपोआप मूळ पदात रुपांतरित व श्रेणी अवनत होईल.

३. सदर आदेश हे वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२०२/२०१७ सेवा-९, दि.२०.७.२०१७ अनुसार वित्त विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०८१०१३२५३९४०१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

K. P. Wadte
Digitally signed by K. P. Wadte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=092f3d18dd73e55dfcdc33acd72708a0290e9758bc4e1500205b182e2d843c82, cn=K. P. Wadte
Date: 2017.08.10 13:16:37 +05'30'

**( कि. पां. वडते )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) महालेखापाल-१(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२) महालेखापाल-२(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर,

३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५) वित्त विभाग (सेवा-९), मंत्रालय, मुंबई,
६) अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) प्रधान सचिव (महसूल/मुद्रांक, नोंदणी व शुल्क) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) श्री.अरुण उन्हाळे (भाप्रसे), सह सचिव (मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) रोख शाखा (२ जादा प्रतीसह), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०) निवडनस्ती.